प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२१-२२ अंतर्गत महाबळेश्वर गिरिस्थान नगरपरिषद हद्दीतील विकास कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२१/०१/प्र.क्र.५१/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०१ फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ :-**
१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१०/०८/प्र.क्र.४६३/पर्यटन, दिनांक ०४.११.२०१०.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक ०४.०६.२०१५.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक १९.०७.२०१६.
४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१९/९/प्र.क्र.५८९/पर्यटन, दिनांक २८.०९.२०२०.
५) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा यांचे पत्र क्र. नियोजन/महाबळेश्वर/वि.कामे/प्रमा/२०२०-२१/का-२-१/७१८,दिनांक २६.०२.२०२१ चे पत्र.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.
७) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा यांचे पत्र क्र. जिनिससा/सांस/प्र.शा/२०२१-२२/का-६/१८०४, दिनांक १२.०८.२०२१.
८) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा यांचे पत्र क्र. नियोजन/आस्था/२०२०-२१/का-६/२४५२३, दिनांक ०५.११.२०२१.
९) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा यांचे पत्र क्र. जिनिससा/सांस/पर्यटन/प्र.मा./२०२१-२२/का-६/२७७७/२०२१, दिनांक २४.१२.२०२१.

**शासन निर्णय:-**

महाबळेश्वर गिरीस्थान नगरपरिषद क्षेत्रास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये -ब॰ वर्ग पर्यटन स्थळाचा दर्जा देण्यात आला आहे. मा.मुख्यमंत्री तसेच मा. उपमुख्यमंत्री यांनी महाबळेश्वर येथील पर्यटन विकासाशी संबंधित कामे करण्याचे निर्देश दिले होते. त्याअनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२६.११.२०२१ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीमध्ये रु.५७००.०० लक्ष रकमेचा महाबळेश्वर पर्यटन विकास कामांचा ढोबळ आराखडा सादर करण्यात आला होता. जिल्हाधिकारी, सातारा यांनी सदर विकास आराखड्यातील कामांची सविस्तर व तांत्रिक मान्यता प्राप्त तपशिलवार अंदाजपत्रके दि.२४.१२.२०२१ च्या पत्रान्वये सादर केली आहेत. त्यानुसार सदर आराखड्याची किंमत आता रु.५७००.०० लक्ष ऐवजी रु.५१९९.७३ लक्ष एवढी झाली असून उच्चाधिकार समितीने शिफारस केल्यानुसार शिखर समितीच्या कार्योत्तर मंजुरीच्या अधिन राहून प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२१-२२ अंतर्गत महाबळेश्वर गिरिस्थान नगरपरिषद हद्दीतील पर्यटन विकासाच्या एकूण

रुपये ५१९९.७३ लक्ष रकमेच्या कामांना खालीत तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रशासकीय मान्यता देऊन पहिल्या टप्प्यात सदर कामांसाठी रु.१५६०.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, सातारा उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लक्षात)**

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **प्रशासकीय मान्यता** | **या आदेशान्वये वितरीत निधी** |
|---|---|---|---|
| १ | महाबळेश्वर नगरपरिषद हद्दीतील मुख्य बाजारपेठ विकसित करणे अंतर्गत डॉ.साबणे रोड तसेच लगतचा सर्व परिसर विकसित करणे | ३९२१.७६ | १५६०.०० |
| २ | डॉ.साबणे रोड व लगतच्या परिसरातील विद्युत लाईन भुमिगत करणे व त्या अनुषंगिक कामे करणे | ८०८.७१ | |
| ३ | महाबळेश्वर नगरपरिषद मालकीच्या पेटीट लायब्ररी इमारतीचे जिर्णोध्दार व सर्व बाजुच्या मोकळ्या जागेचे सुशोभिकरणक करणे | ४६९.२६ | |
| | **एकूण** | **५१९९.७३** | **१५६०.००** |

२. सदर पर्यटन विषयक विकास कामांसाठी महाबळेश्वर गिरिस्थान नगरपरिषदे ही अंमलबजावणी / कार्यान्वयीन यंत्रणा राहील.

३. प्रस्तावित पर्यटन विषयक विकास कामे कालमर्यादित स्वरुपात पूर्ण करुन उपयोगात आणावयाची असल्याने त्याकरीता आवश्यक निधी एकूण तीन टप्प्यामध्ये (प्रथम टप्प्यातील निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर दुसऱ्या टप्प्यातील निधीवाटप, दुसऱ्या टप्प्यातील निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर तिसऱ्या टप्प्यातील निधीवाटप यानुसार) वितरीत करण्यात येईल

४. <u>अटी व शर्ती</u>

1. अंमलबजावणी यंत्रणेने निधीच्या उपयोगितेबाबत स्वतंत्र खाते उघडून त्यात योग्य त्या नोंदी घ्याव्यात. तसेच निधीच्या वापराबाबत नियमानुसार लेखापरिक्षण करण्यात यावे.
2. प्रस्तावित कामांचे संनियंत्रण जिल्हाधिकारी, सातारा यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत केले जावे. तसेच कामाच्या प्रगतीबाबत पर्यटन विभागामार्फत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा.
3. सदर विकास कामे केल्यानंतर निर्माण होणाऱ्या मालमत्तेची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी तसेच त्याकरीता आवश्यक निधीची तरतूद करण्याची जबाबदारी महाबळेश्वर गिरिस्थान नगरपरिषदेची राहील.
4. प्रादेशिक पर्यटन विकास योजनेच्या शासन निर्णय, दिनांक ४ नोव्हेंबर, २०१० मधील अटी व शर्तीचे उल्लंघन झाल्याचे भविष्यात निदर्शनास आल्यास देण्यात आलेला संपूर्ण निधी व्याजासह वसूल करण्यात येईल.
5. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

६. कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सातारा यांची राहील जादा खर्चा प्रित्यर्थ अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. पर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी सदर कामे पर्यटन विभागाने प्रादेशिक पर्यटन विकास योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून केली असल्याबाबतचे फलक लावण्यात यावेत.

८. ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

९. अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे विहित कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दिनांक ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/ प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

१०. तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

११. रस्त्यांच्या कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

१२. योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१३. सदर कामांसाठीच्या जागेसंदर्भात योग्य त्या विभाग प्राधिकरण किंवा कार्यालय / संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील.

१४. अंमलबजावणी / कार्यान्वयीन यंत्रणेने उपरोक्त कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे जिल्हाधिकारी, सातारा यांच्यामार्फत दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत पर्यटन संचालनालयास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता पर्यटन संचालनालयास सादर करण्यात यावे.

१५. संचालक, पर्यटन संचालनालय यांनी झालेल्या कामाची स्थळपाहणी करुन तपशीलवार अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर कामांवर होणारा खर्च त्या-त्या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१, सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली मंजूर व उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६. मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता सहायक जिल्हा नियोजन अधिकारी/ जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा यांना -आहरण व संवितरण अधिकारी॰ आणि जिल्हाधिकारी, सातारा यांना -नियंत्रण अधिकारी॰ घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी जिल्हा कोषागार कार्यालय, सातारा येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्याच्या आत सादर करण्यात यावा.

५. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१ आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०११२४०१४६८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2022.02.02 13:07:23 +05'30'

**( र. ज. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. जिल्हाधिकारी, सातारा.
६. जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
८. मुख्याधिकारी, महाबळेश्वर गिरिस्थान नगरपरिषद, महाबळेश्वर, जिल्हा सातारा.
९. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा यांच्याकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
११. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***